सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) अंतर्गत प्राप्त झालेला केंद्र शासनाच्या दुसऱ्या हप्त्याच्या निधीच्या समरूप राज्य शासनाच्या हिश्याचा (सर्वसाधारण) निधी सन २०१९-२० मध्ये वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०२०/प्र.क्र.३५/योजना-१०**

बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,

फोर्ट, मुंबई - ४०० ००१.

तारीख: तारीख: ११ फेब्रुवारी, २०२०

**वाचा :-**

१) उप सचिव (ग्रामीण गृहनिर्माण), ग्रामीण विकास मंत्रालय भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्र. J१२०२५/०३/२०१८-RH (A/C)-३-Maharashtra, दि.०१.०२.२०२० रोजीचे आदेश.

२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८.०७.२०१९.

३) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र. २१५२/न.क्र.१९९/लेखा/(प्रआयो)/ २०१९, दि.०४.०२.२०२०.

**शासन निर्णय:-**

प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीण या योजनेसाठी केंद्र शासनाने सन २०१८-१९ या वर्षासाठी महाराष्ट्र राज्यास वितरीत केलेल्या निधीच्या हिश्यास समरूप राज्य शासनाचा हिस्सा रू. ६६,६०,८६,७००/- (सर्वसाधारण) (अक्षरी रू. सहासष्ठ कोटी साठ लक्ष शहाऐंशी हजार सातशे फक्त) एवढा निधी खर्च करण्यास व अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०१९-२० या वर्षातील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच, मागणी क्र. एल-३, २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७०२ जवाहर ग्रामसमृध्दी योजना, (०१)प्रधानमंत्री आवास योजना, (०१)(०१) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) - सर्वसाधारण योजना (राज्य हिस्सा ४० %) (२५०५ ०५६८), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती कार्यासन योजना-२ यांना सादर करण्यात यावी. १) मंजूर केलेली रक्कम, २)

कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा देयक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयात नोंद झालेल्या रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

४. प्रस्तुत निधीबाबत उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून (संकेतांक क्रमांक १२०१००५१८३) तसेच संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण -गृहनिर्माण हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधीचे देयके ठाणे कोषागार अंतर्गत उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर येथे पारित करण्यात यावेत.

५. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८.०७.२०१९ अन्वये अटी व शर्तीची पूर्तता करीत असल्याने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१११५३१२३०७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hemant Sudhakar Pathak

Digitally signed by Hemant Sudhakar Pathak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a58924bb1ebc2ed6699e048bfa42ad41d1ed32de1e3eda84d0c03040473905e, cn=Hemant Sudhakar Pathak
Date: 2020.02.11 15:56:56 +05'30'

**(हे.सु.पाठक)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतींसह)

२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, कम्बाटा इमारत, ४२ महर्षी कर्वे रोड चर्चगेट, मुंबई.

३) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे

४) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन बेलापूर

५) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

६) वित्त विभाग (व्यय-१५) व (अर्थ-१७) मंत्रालय मंबई-३२.

७) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.

८) निवड नस्ती (योजना-१०)